आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी स्वेच्छाधीन अनुदान (विस्तार व सुधारणा) या योजनेसाठी निधी वितरण.
(लेखाशिर्ष २७०२८७५१)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४ /प्र.क्र. ११/ कार्यासन ६
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५.
३) आदिवासी विकास विभाग, पुनर्विनियोजन ज्ञापन क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र.२/कार्यासन-६, दि. २९ मार्च, २०२५.
४) आदिवासी विकास विभाग, नस्ती क्र.बीयुडी-२०२४/प्र.क्र. २/कार्या-६.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील सुधारीत अंदाजाद्वारे मंजूर करण्यात आलेल्या तरतुदींतून मुख्य मागणी क्र.टी-५ मध्ये योजनानिहाय होणाऱ्या संभाव्य बचतीमधून जलसंधारण विभागाच्या योजनेकरीता पुनर्विनियोजनाद्वारे निधी वितरणासाठी उपलब्ध करुन देण्याबाबत वित्त विभागास संदर्भाधीन क्र.४ अन्वये प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २७०२-लहान पाटबंधारे या मुख्य लेखाशीर्षाखाली स्वेच्छाधीन अनुदान (विस्तार व सुधारणा) या योजनेकरीता सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात निधी वितरीत व खर्च करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

(रु. लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी मंजूर सुधारीत अंदाज | यापूर्वी वितरीत निधी | या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| स्वेच्छाधीन अनुदान (विस्तार व सुधारणा) | २७०२८७५१ | २७-लहान बांधकामे | ०.०१ | ०.०० | २८.७६ |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.२८.७६ लाख (अक्षरी रुपये अठ्ठावीस लाख शहात्तर हजार फक्त) इतका निधी विभागप्रमुख म्हणून प्रधान सचिव, जलसंपदा विभाग यांना** अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ च्या शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.४३९/२०२५/व्यय-१४, दि.२७.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२९१४२८०९१२२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIJESING FATTESING VASAVE

Digitally signed by VIJESING FATTESING VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2182F4F20DAA6841AB430B2FD812E7B5D3A883E72EFA574CA5E29FF528BC8015, cn=VIJESING FATTESING VASAVE
Date: 2025.03.29 20:15:07 +05'30'

( वि. फ. वसावे )

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. मा.राज्यमंत्री,आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

६. ग्रंथपाल, महाराष्ट्र राज्य विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई

७. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.

८. कक्ष अधिकारी (का ५), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.

१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.